मराठी प्रत

# साप : समज व गैरसमज

संतोष टकले







टकले चॅरिटेबल ट्रस्ट, शिरढोण, पनवेल, रायगड, महाराष्ट्र, भारत – ४१०२०६.

# मनोगत व प्रस्तावना

'साप' हा शब्दसुद्धा बहुतेक लोकांना भितीदायक वाटतो. साप व संबंधित विषयांवर सखोल विवेचन करणारी अनेक पुस्तके मान्यवर व्यक्तींनी, जगजागृती करण्याच्या हेतूने लिहीली आहेत. अशाच पुस्तकांच्या अभ्यासावरून व स्व:अनुभवावर आधारित हे पुस्तक आपणा समोर सादर करताना मला आनंद होत आहे.

हे पुस्तक लिहिण्याचा उद्देश हा सापांविषयीचे जनमानसांत असलेले गैरसमज दूर करणे आहेच, सोबत साप ओळखण्यासाठी आवश्यक जुजबी माहिती, प्रथमोपचार, सर्पदंश होऊ नये म्हणून प्रतिबंधात्मक उपाय व अधिक माहितीसाठी पुस्तकरूपाने व इंटरनेटवर उपलब्ध असलेले स्त्रोत/पर्याय सर्वसामान्यांपर्यंत पोहोचविणे हा आहे.

या पुस्तकाच्या पूर्ण होण्यात माझ्या पत्नी वैशाली यांचा सिंहाचा वाटा आहे.

**सदर पुस्तक हे मोफत असून, आपणास हे पुस्तक आवडल्यास देणगी मूल्य म्हणून कमीत कमी रूपये ३०/- कोणत्याही सामाजिक संस्थेस, स्वखुशीने आर्थिक मदत म्हणून द्यावे, ही विनंती.**

**संदर्भ :** खालील सर्व संदर्भग्रंथांचे, संकेतस्थळांचे, संस्थाचे व व्यक्तींचे आम्ही ऋणी आहोत.

१. संदर्भग्रंथ / पुस्तके :

a. आपल्या भारतातील साप - रोम्युलस व्हीटेकर ( अनुवाद - मारूती चितमपल्ली )
b. सर्पविज्ञान - उल्हास ठाकूर
c. सापांविषयी - झई आणि रॉम व्हीटेकर (अनुवाद - वसंत शिरवाडकर)
d. SNAKES - निलिमकुमार खैरे.

२. Websites / **संकेतस्थळ** :

| | |
|---|---|
| 1. http//www.indiansnakes.org | 4. http//www.indianherps.org |
| 2. http//www.landofthewild.com | 5. http//www.naturfoto.cz |
| 3. http//www.arkive.org | 6. en.wikipedia.org |
| 7. You tube Channel & Knowledge Hour video by Santosh Takale<br>http://www.youtube.com/user/TakaleSantosh<br>http://www.youtube.com/watch?v=xE1ss_p09sw | |

३. **व्यक्ती / संस्था** :

| | | |
|---|---|---|
| 1. Nilimkumar Khaire | 3. Ashok Captain | 5. Raju Mumbaikar & CON, Veshvi. |
| 2. Ulhas Thakur | 4. Kailas Darule | 6. Wild Explorer, Panvel. |

**- संतोष टकले.**

# अनुक्रमणिका

## सर्पविश्वाची ओळख/सर्पजगत :

पृथ्वीवर निर्माण झालेल्या सर्वात प्राचीन सजीव प्रजातींपैकी 'साप' हे एक आहेत. पर्यावरणाशी जुळवून घेण्याच्या त्यांच्या जीवनपद्धतीमुळे त्यांचे अस्तित्व आजही टिकून आहे. आश्चर्यकारक बाब म्हणजे ध्रुवीय प्रदेश वगळता, पृथ्वीच्या पाठीवर ते सर्वत्र आढळतात. जगभरात सापांच्या सुमारे ३000 हून अधिक प्रजाती आहेत. भारतात २७५ हूनही अधिक प्रकारचे साप आढळतात. त्यातील ५२ प्रजाती विषारी सदरात मोडतात. जवळ-जवळ ४0 प्रजाती या समुद्रसर्पांच्या असून विषारी आहेत. अर्थातच आपल्यासाठी समाधानकारक बाब म्हणजे आपल्या परिसरातील फारच थोडे साप हे विषारी असतात. ह्या विषारी सांपापैकी नाग, मण्यार, घोणस व फुरसे यांना 'बडे चार' म्हणून संबोधण्यात/ओळखण्यात येते. साप हे शीत रक्ताचे प्राणी (वातावरणात होणाऱ्या बदलाप्रमाणे सापांच्या शरीराचे तापमान बदलते) असून ते अतिशय थंड किंवा उष्ण हवामान सहन करू शकत नाहीत. $८^{0}$ सेल्सिअस ते $४५^{0}$ सेल्सिअस हे तापमान त्यांना जगण्यास अनुकूल असते. खाल्लेले अन्न हे शरीराचे तापमान टिकवण्यासाठी वापरले जात नाही त्यामुळे साप अन्नाशिवाय अनेक दिवस जगू शकतात. सर्प उद्यानातील केलेल्या अभ्यासात अजगरांना दोन वर्षाहूनही अधिक काळ अन्नाविना जिवंत असल्याचे पाहण्यात आले आहे. खरेतर साप अल्पसंतुष्टच असतात. त्यांना आवश्यक असेल तेव्हाच ते अन्न घेतात. परंतु शरीराचा ७0% भाग हा पाण्याने बनलेला असल्या कारणाने, पाणी हे त्यांच्यासाठी आवश्यक असते. पाणी उपलब्ध नसताना, साप भक्ष्यातील शरीर रसांचा उपयोग पाण्याची गरज भागविण्यासाठी करतात.

सापांच्या परिसराशी अनुरूप असलेल्या रंगरूपामुळे, निसर्गात मुबलक प्रमाणात साप असतानाही त्यांचे आपणास सहसा दर्शन होत नाही. सापांच्या शरीरावर असलेल्या खवल्यांमुळे त्यांची त्वचा कोरडी राहते. घामाच्या ग्रंथी नसल्याने शरीरातील टाकाऊ पदार्थ कातीच्या (बाह्य त्वचेचे आवरण) स्वरूपात बाहेर टाकले जातात. सुरूवातीचे कात टाकण्याचे प्रमाण हे अधिक असते. त्यानंतर प्रत्येक अडीच ते तीन महिन्यांनी साप कात टाकतो. कात टाकल्यावर साप तेजस्वी व तरतरीत दिसतो. खवल्यांमुळे अतिनील व इन्फ्रारेड किरणांपासून त्यांचे संरक्षण होते. तसेच एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी सरपटत जाता येते. मात्र खवल्यांअभावी समुद्रसापांना जमिनीवर सरपटता येत नाही.

स्वसंरक्षणासाठी साप अनेक पद्धती वापरतात. जसे शक्यतो कोणाच्याही नजरेस स्वत:ला पडू न देणे, शत्रूशी सामना झाल्यास पळून जाणे किंवा लपणे. अंगावर घेतले असता जोरजोराने सतत फुत्कार सोडणे, मान उंच करून फणा काढणे, मान चपटी करणे अथवा शरीर फुगवणे, शरीराचे वेटोळे करून निश्चेष्ट पडून राहणे, शेपटी वळवळविणे आणि कोणी पकडलेच असता विष्ठा टाकणे, दुर्गंधी सोडणे, ओकणे, इ. अगदीच नाईलाज असेल तर साप हल्ला करतात, अंगावर येतात व दंश करतात. या मागे कुठलाही पूर्वनियोजित डाव किंवा सूडाची भावना नसते.

सर्व सापांमध्ये डोळे, जिभ, त्वचा, दात, शेपटी हे अवयव असतात. अजगर आणि चापडा यांसारख्या सापांमध्ये उष्माग्राहक (तापमान संवेदनक्षम) बारीक खड्डे, डोळे व नाकपुडया यांच्यामध्ये असतात. सापांना बाह्यकर्ण नसतात, त्यामुळे आवाजाचे ज्ञान हवेतील ध्वनीलहरींमुळे होत नाही, परंतु जमिनीमार्फत कंपनाने होते. साप दोन्ही डोळयांनी दोन वेगवेगळी दृश्ये पाहू शकतो. झाडावर वास्तव्य करणाऱ्या सापांची दृष्टी इतर सापांपेक्षा चांगली असते. बहुतांश दिनचर वृत्तीच्या सापांच्या डोळयांची बाहुली गोल व मोठी असते तर निशाचर सापांच्या डोळयांची बाहुली उभी असते. सापांच्या डोळयांवर पारदर्शक आवरण असते, परंतु माणसांप्रमाणे पापण्या नसतात. साप खुप जलद असतात हा सर्वसाधारण गैरसमज आहे. वास्तवत: त्यांचा वेग अदमासे ७ किमी प्रति तासाच्या आसपास असतो, सर्वात जलद हालचाल करणारा आफ्रिकेतील विषारी 'ब्लॅक माम्बा' हा साप सुद्धा १२ ते १५ किमी प्रति तास या वेगानेच हालचाल करतो.

सापाची जीभ लांब असून, टोकाजवळ दुभंगलेली असते. भक्ष्य शोधताना साप जीभ सारखी आत बाहेर करत असतो. सापाचे दोन्ही जबडे बंद असतानाही त्याला जीभ बाहेर काढता येते आणि जिभेचा वापर नसताना ती खालील जबडयातील गोलाकार नलिकेत असते. जिभेचे रंग विविध असून, दोन्ही टोके नाजूक आणि ओलसर असतात. दोन्ही टोकांच्या साहाय्याने साप हवेतील धुलीकण आणि गंधकण गोळा करून वरील जबडयातील 'जेकबसन' इंद्रियापर्यंत घेऊन जातो. यामुळे सापाला गंधज्ञान होते. भक्ष्याला आपल्याकडे आकर्षित करण्यासाठीही काही साप आपल्या जिभेचा वापर करतात.

## सापांचे वर्गीकरण :

सापांचे डोके, शेपटी, खवले, आकार, डोळयांची बाहुली, चाल, वास्तव्य करण्याची जागा, प्रजनन पद्धती, भक्ष्य, इत्यादींना आधार मानून अनेक प्रकार पडतात. परंतु सापांची विष निर्माण करण्याची क्षमता व त्यापासून मानवाला होणारे अपाय, यांवर त्यांचे मुख्य वर्गीकरण होऊ शकते. सामान्य माणसाच्या दृष्टीने हे वर्गीकरण फार महत्वाचे आहे. या आधारे सापांचे तीन मुख्य प्रकार पडतात :

१) **बिनविषारी साप** : या सापांमध्ये विष अथवा विषग्रंथी नसल्याकारणाने त्यांचा दंश मानवास अपायकारक नसतो. त्यांच्या चावण्याने जीवितास धोका निर्माण होत नाही. परंतु सापांबद्दल असणाऱ्या अज्ञानामुळे व भितीमुळे बहुसंख्य असणाऱ्या या सापांची विनाकारण हत्या होते. उदा. नानेटी, दिवड, धामण, इ.

२) **निमविषारी साप** : या सापांमध्ये असलेली विषाची मात्रा आणि स्वरूप हे भक्ष्याला बेशुद्ध करण्यास व पचविण्यास मदत करते. या सापांच्या विषाने सुद्धा माणसाच्या जीवितास कोणतीही हानी पोहोचत नाही. उदा. मांजऱ्या, हरणटोळ, इ.

३) **विषारी साप** : या सापांमध्ये विषदंत व विषग्रंथी असतात. विषग्रंथीतील विष, विषदंताद्वारे दंश करतावेळेस भक्ष्याच्या शरीरात सोडले जाते. सापाचे भक्ष्य बेशुद्ध करण्यास, त्याचा प्रतिकार कमी करण्यास व गिळल्यानंतर ते पचविण्यास हे विष मदत करते. मनुष्यप्राण्यासाठी सुद्धा हे विष अपायकारक असते आणि योग्य वैद्यकीय उपचारांच्या अभावी हे विष जीवघेणे ठरू शकते. उदा. नाग, मण्यार, फुरसे, घोणस, समुद्रसर्प, इ.

### सापांचे इतर प्रकार :

❖ वास्तव्य करण्याच्या जागेनुसार :
- बिळात राहणारे साप : उदा. मंडोळ, डुरक्या घोणस, नाग, इ.
- झाडावर राहणारे साप : उदा. हरणटोळ, चापडा, रूकासर्प, तस्कर, इ.
- पाण्यात राहणारे साप : उदा. दिवड, समुद्रसर्प, इ.
- जमिनीवर राहणारे साप : उदा. नानेटी, अजगर, धामण, इ.

वावरण्याच्या सवयी व वेळेनुसार दिनचर, निशाचर हे प्रकार पडतात. दिनचर सापांच्या डोळयांची बाहुली गोल असते. उदा. धामण, नानेटी, कवडया, इ. झाडावर राहणाऱ्या सापांची दृष्टी इतर सर्व सापांपेक्षा चांगली असते आणि त्यांचे डोळेही इतर सापांपेक्षा मोठे असतात. निशाचर सापांच्या डोळयांची बाहुली उभी असते. त्याद्वारे आपल्या दृष्टीपटलावर पडणारा प्रकाश ते नियंत्रित करू शकतात. उदा. मांजऱ्या, अजगर, चापडा, इ. हरणटोळ या सापाचे वैशिष्टय म्हणजे, त्याच्या डोळयांची बाहुली आडवी असते.

❖ सापांचे पुनरूत्पादन दोन प्रकारे होते :
- अंडज सर्प अंडी घालतात. उदा. नाग, मण्यार, अजगर, धामण, इ.
- तर काही सापांच्या माद्या डायरेक्ट (प्रत्यक्ष) पिलांना जन्म देतात. उदा. घोणस, चापडा, हरणटोळ, इ.

❖ सापांच्या चालीचे तीन प्रमुख प्रकार आहेत : नागमोडी चाल, सुरवंटासारखी चाल आणि वेलांटी चाल.
- 'नागमोडी चाल' करताना साप डोक्यापासून शेपटीच्या टोकापर्यंत जमिनीवर 'S' सारख्या नक्षीप्रमाणे पुढे सरकताना दिसतो. लांब शरीराचे परंतु सडपातळ असलेले सर्व साप याच पद्धतीचा वापर करतात. उदा. नाग, धामण, धूळनागिण, गवत्या इ.
- 'सुरवंटासारख्या चाली'त साप वेटोळे टाकत नाहीत. ते सुरवंटाप्रमाणे आपले शरीर मधे उचलतात व पुढे सरकतात. उदा. अजगर, घोणस, इ.
- फुरसे, वाळवंटी प्रदेशात राहणारे साप, आपली मान उचलून, तिरकी करून पुढे सरकवितात. त्यामुळे त्यांचे शरीर एका बाजूस फेकल्यासरखे दिसते. असे तिरके सरपटण्याच्या पद्धतीस 'वेलांटी चाल' असे म्हणतात.

उंदीर, घुशी, बेडूक, सरडे, पाली, छोटे पक्षी, झाडा-पानांवरील किटक, मासे इ. खाऊन साप आपली गुजराण करतात. परंतु मण्यार, नाग व नागराज हे सर्व स्वजातभक्षक आहेत.

याचप्रमाणे साप ज्यांचे भक्ष्य आहे, अशा प्राण्यांमध्ये/पक्ष्यांमध्ये घुबड, मोर, मुंगुस, गरूड, बगळा, ससाणा यांचा समावेश होतो. साप हे माणसाचे भक्ष्य नसताना देखील, माणूस हा सापांचा सर्वात मोठा शत्रू आहे. सत्य शास्त्रीय माहितीचा अभाव व भीतीपोटी तो त्यांची हत्या करतो.

## साप - मानवमित्र :

कृतक प्राण्यांचा नाश करणाऱ्या शिकारी पक्ष्यांचे महत्त्व सांगताना, पक्षिमित्र सलीम अली म्हणाले होते की, २० ते ५० टक्के अन्नाची नासाडी कृतक प्राणी करतात. चहाच्या मळयांचे लाखो रूपयांचे नुकसान होते. सापांचे मुख्य अन्न उंदीर आहे. उंदरांची प्रजनन क्षमता प्रचंड आहे. उंदरांची एक जोडी वर्षाला ८५० पेक्षा अधिक पिलांना जन्म देते. उंदीर देशातील २५-३० टक्के अन्न खातात अथवा त्याची नासाडी करतात. पिकांवरील किटक, डासांच्या अळया-अंडी, उंदीर, घुशी यांवर नैसर्गिकरित्या नियंत्रण ठेवण्याचे काम सर्व प्रकारचे साप करतात. एक धामण १ वर्षात शेकडो उंदीर व घुशी खाते. त्यामुळे साप हे फक्त मानवमित्र नसून खरे निसर्गमित्र आहेत. ते अन्न साखळीतील एक महत्वाचा घटक असून, पर्यावरण संतुलनाचे महत्वपूर्ण कार्य अप्रत्यक्षपणे करत असतात. मानवनिर्मित उंदीर पकडायचे पिंजरे अथवा किटकनाशके यांपेक्षा सापांचे उंदीर पकडण्याचे तंत्र परिणामकारक आहे, कारण ते नैसर्गिक आहे.

सापांचे विष हे अति उपयुक्त पदार्थ आहे. विषारी द्रव्यासोबत त्यांमध्ये मानवास उपयुक्त असे अनेक घटक असतात. सर्पविषाचे पृथःकरण करून, त्यातील घटकांचा वापर औषधांमध्ये केला जातो. जसे, रक्तस्त्राव थांबविण्यासाठी घोणसाच्या विषाचा वापर केला जातो, कारण त्यामध्ये रक्ताच्या गुठळया बनविण्याचा गुणधर्म असतो. तसेच स्त्रीयांचे गर्भाशय, मानवी डोळयांचे बुब्बुळ यातून होणाऱ्या रक्तस्त्रावावर हा उपचार केला जातो. फेफरे, दमा, संधिवात, उसण, माकडहाडाचे दुखणे, यांवर उपाय म्हणुन सुद्धा नागाच्या विषापासून बनविलेले वेदनाशामक वापरले जाते. तीव्र स्वरूपाच्या वेदनांवर ते गुणकारी आहे. सापांच्या विषापासूनच विषप्रतिबंधक लस बनवितात . हा त्यांचा आणखी एक महत्वाचा उपयोग आहे. सर्पदंशावर फक्त या लसीचाच खात्रीशीर इलाज होतो.

## साप - गैरसमज :

आजमितीस सुद्धा जगात सापांविषयी शास्त्रीय माहितीपेक्षा, लोकांकडून मिळालेल्या काल्पनिक व ऐकीव माहितीवर आधारीत गोष्टीच, अन्य कोणत्याही विषयापेक्षा प्रचलित असल्याचे आढळून येते. हे वास्तव सर्प दंश, सर्प स्वभाव, त्यांचा दुष्टपणा, सर्प दंशावरील उपाय, या सर्वांना लागू होते. त्यामुळे भारतासारख्या आशियाई देशात लोक सर्पमंदिरे बाधंतात, त्यांची पूजा करतात. पण जीवाच्या भितीमुळे व अज्ञानाने अगदी निरूपद्रवी सापांना सुद्धा ठेचून-ठेचून मारतात. हा विरोधाभास शास्त्रीय माहितीच्या अभावामुळे आहे. या सर्वांतूनच अनेक अंधश्रद्धांचा उगम होतो. या अंधश्रद्धा कधी धर्माशी, पुरातन वाङमयाशी अथवा ऐकीव माहितीशी निगडीत असतात. बुवा, बाबा, गारूडी, आपले पोट भरण्यासाठी अशा अनेक भीतीप्रद गोष्टी समाजात पसरवत असतात.

**प्रत्येक सापाविषयी अंधश्रद्धा (गैरसमज) आहेतच, परंतु सर्वसाधारणपणे एकंदर सर्प जमाती विषयीचे गैरसमज प्रथम पाहू या.**

१. **सर्वच साप विषारी असतात व म्हणून कुठलाही साप चावला तरी माणूस मरतो.**
   **सत्य** ः आपण पाहिले, फारच थोडे साप हे विषारी असतात व योग्य प्रशिक्षण अभ्यासाने त्यांना ओळखणे सहज शक्य आहे. तसेच फक्त विषारी सापांचा दंश अपायकारक होऊ शकतो. परंतु योग्य वेळी केलेल्या वैद्यकीय उपचाराने हा अपाय सुद्धा टाळता येऊ शकतो.

२. **साप दूध पितो कारण ते त्यांचे आवडते खाद्य आहे.**
**सत्य** ः साप हे सरपटणाऱ्या गटातील प्राणी असून मांसाहारी आहेत. दूध हे त्यांचे अन्न नाही, त्यामुळे त्यांच्या पचनसंस्थेला अपाय होतो. जेव्हा आपण गारूडयाकडे असलेल्या सापांना दूध पिताना पाहतो, त्यामागील सत्य फार विदारक असते. या सर्व पकडलेल्या सापांना गारूडी कित्येक महिने अन्न-पाण्यावाचून ठेवतात. अशा अवस्थेत तहानलेला साप दूधाला पाणी समजून पितो. आपणसुद्धा आपल्या धार्मिकतेमुळे त्यांच्या दु:खात भर घालतो.

३. **साप, गाई व म्हशींच्या पायाला वेटोळे घालून कासेला तोंड लावून दूध पितो.**
**सत्य** ः आपणास माहित आहे की, दूध हे सापाचे अन्न नाही. तसेच सापाचे दात हे फार तीक्ष्ण व धारदार असतात. त्यांचा दंश शांतपणे कोणीही सहन करू शकत नाही. त्यामुळे वरील गैरसमज हा खरंच अर्थहीन आहे.

४. **सापांना संगीत आवडते अथवा नाग पुंगीच्या तालावर डोलतो.**
**सत्य :** सापांना बाह्यकर्ण नसतात, त्यामुळे त्यांना हवेमार्फत येणाऱ्या आवाजाचे ज्ञान होत नाही. परंतु जमिनीमार्फत शरीरापर्यंत पोहोचणारी कंपने त्यांना जाणवू शकतात. गारूडयांच्या पुंगी समोर डोलणे हा सापांचा, पुंगीचा वेध घेण्याच्या प्रयत्नाचा एक भाग असतो. स्वसंरक्षणाचा तो एक बचावात्मक पवित्रा असतो. बऱ्याचवेळा साप पुंगीला चावण्याचा प्रयत्न करतो, ज्याकडे आपण जाणुनबुजून दुर्लक्ष करतो .

५. **रात्री शिळ घातली असता अथवा साप हा शब्द उच्चारला असता, साप तो आवाज ऐकून घरात येतो.**
**सत्य :** आपण वर पाहिले की सापांना बाहयकर्ण नसल्याने त्यांना हवेमार्फत ध्वनीज्ञान होत नाही. तसेच त्यांचा मेंदू जास्त उत्क्रांत नसल्याने संगीत, शीळ अथवा मानवनिर्मित भाषा समजू शकत नाही. त्यामुळे वरील विधान हे गैरसमज आहे हे मात्र नक्की.

६. **सापांना सुगंध आवडतो म्हणून केवडा, रातराणी, चाफा या झाडांवर त्यांचे अस्तित्व असते.**
**सत्य :** सापांचे गंधज्ञान खुप चांगले असते व त्याचा वापर ते भक्ष्य मिळविण्यासाठी व शत्रूपासून बचाव करण्यासाठी करतात. वरील फुलझाडे त्यांच्या सुगंधामुळे अनेक प्रकारचे किटक आकर्षित करतात, त्यामुळे पाली, सरडे इ. भक्षक सुद्धा तेथे येतात. त्यांच्या मागावर साप तेथे येतात. या झाडांच्या रचनेमुळे असलेल्या दमट, थंड जागी ते राहणे सुद्धा पसंत करतात. याचा अर्थ सापांना सुगंध आवडतो असा होत नाही.

७. **साप संमोहित करतो किंवा साप जादूई शक्तीने माणसांस आजारी पाडतात.**
**सत्य :** साप हे एक सरपटणारे प्राणी आहेत, त्यांच्यामध्ये कुठल्याही प्रकारची जादूई शक्ती किंवा संमोहन कला नसते. परंतु घाबरलेल्या व्यक्तीसाठी पापण्या नसलेले सापाचे एकटक पाहणारे डोळे व लवलवणारी जीभ हे तशा प्रकारचा आभास निर्माण करत असावी व त्यामुळे इतर कवी कल्पनांना चालना मिळत असावी.

८. **साप योजनाबद्ध पद्धतीने त्रास देणाऱ्या व्यक्ती किंवा समूहाचा बदला घेतात किंवा सूड उगवतात. त्याचप्रमाणे साप डूख धरतात अथवा पाठलाग करतात.**
**सत्य :** सापांचा मेंदू फार विकसित नसतो. सर्व शरीराच्या १ टक्क्याहूनही कमी वजन त्यांच्या मेंदूचे असते. मेंदू फक्त शरीर प्रक्रिया सांभाळतो. बुद्धीमत्ता, स्मरणशक्ती इतकेच काय त्यांची दृष्टी सुद्धा फार कमकुवत असते. अशा परिस्थितीत माणसे लक्षात ठेवणे, त्यांचा पत्ता शोधणे व योजनाबद्ध बदला घेणे हे सापांसाठी अशक्यप्राय आहे. बऱ्याच सापांमध्ये नर व मादीतील संबंध समागमापुरताच असतो. काही वेळा भुकेलेला जोडीदार समागमानंतर दुसऱ्या जोडीदारालाच खाऊन टाकतो. त्यामुळे प्रेमभावना अथवा बदला हे सापांसाठी सद्ययुगात अशक्य आहे.

९. **साप पूजेने प्रसन्न होतो व मानवी इच्छा पूर्ण करतो अथवा सापांची पूजा केल्यास अथवा उपवास केल्यास सर्पदंश बाधत नाही.**
**सत्य :** सापांचा मेंदू अविकसित आहे, त्यामुळे परंपरागत रूढी, मंत्र, नैवेद्य यांचा अर्थ त्याला समजणे कठीण आहे. आज त्यांचेच अस्तित्त्व धोक्यात आले आहे, त्यांच्या काही जाती तर नष्ट सुद्धा झाल्या आहेत. अशा परिस्थितीत सापाकडून माणसांच्या अवास्तव अपेक्षा पूर्ण होणे त्यांच्या क्षमते बाहेरचे आहे, असे वाटते.

१०. **साप धनसंपत्तीचे रक्षण करतो.**

**सत्य :** आपल्या शत्रूपासून बचाव करण्यासाठी साप लपून राहणे पसंत करतात. जुने, निर्जन पडके वाडे, इमारती, यासाठी योग्य जागा असतात. तसेच जमिनीखाली, भुयारी जागेत ठेवलेले मातीचे मडके अथवा लाकडी संदुक हे सापांना पूरक थंड, दमट वातावरण देतात. त्यामुळे अशा जागी आपण गेल्यास साप आधीच हजर असल्याचे दिसते व नको ते गैरसमज पसरतात. खरे पाहता, सोने, पैसा, दाग-दागिने या जगण्यास अनावश्यक असलेल्या गोष्टीत माणसा व्यतिरिक्त कुठल्याच प्राण्याला (जीवाला) रस नसतो.

११. **साप पुनर्जन्म घेतात किंवा काही जन्मांनंतर सापाला पंख फुटतात व तो उडू शकतो अथवा इच्छारूप धारण करू शकतो अथवा मानवी अवतार घेऊ शकतो.**

**सत्य :** साप शरीरातील टाकाऊ पदार्थ, बाह्य त्वचा, आवरणाच्या स्वरूपात टाकतो. दर काही महिन्यांनी हे घडत असते. कात टाकण्यापूर्वी व नंतरचे सापाचे रूप/स्वरूप यात बरेच अंतर असते. अर्धमेला, आजारी वाटणारा साप कात टाकल्यानंतर, तजेलदार व सुंदर दिसतो. या भौतिक बदलाच्या अज्ञानामुळेच सापांच्या पुनर्जन्माच्या कहाण्या रचल्या गेल्या असाव्यात. तसेच सापांना पंख नसतात. काही साप उंच झाडावरून तरंगत खाली उतरतात. याला शब्दश: उडणे म्हणता येणार नाही. कारण याच पद्धतीने त्यांना खालून वर जाता येत नाही. असे उडते साप उदा. सोनसर्प काही मीटर अंतरच तरंगतात. आपल्याला वाटते त्याप्रमाणे किंवा चित्रपटात दाखवितात त्याप्रमाणे ते काही किलोमीटर उडत नाहीत. सापांना अतींद्रिय शक्तीद्वारे इतर कुठलेही रूप घेता येत नाही. कारण तसे असते तर निसर्गात राहून निसर्गाशीच बेशिस्तपणे वागणाऱ्या माणसाला त्यांनी कधीच धडा शिकविला असता.

१२. **गोडया पाण्यातले पाणसर्प (बिनविषारी) जमिनीवर आले असता, विषारी होतात अथवा विषारी साप (नाग) पाण्यात पडल्यास, बिनविषारी होतो.**

**सत्य :** विषारी सापांना जन्मापासूनच विषग्रंथी व विषदंत असतात. परंतु बिनविषारी सापांना हे भाग जन्मापासूनच नसतात. या शारीरीक अंगाचा सापाचे तात्पुरते पाण्यात असण्याशी किंवा नसण्याशी काही संबंध नसतो. त्यामुळे बिनविषारी पाणसाप जमिनीवर असताना सुद्धा बिनविषारीच असतो व विषारी साप पाण्यात असतानाही विषारीच असतो. याबाबत महत्वाचे म्हणजे पाण्यात असून सुद्धा समुद्रसर्प हे जगातील सर्वात विषारी साप असतात.

१३. **साप मारल्यानंतर त्यांच्या रक्तातून अनेक पिल्ले तयार होतात.**

**सत्य :** सापांचे पुनरूत्पादन पिलज किंवा अंडज या स्वरूपाचे असते. अंडज साप मादीने घातलेल्या अंडयातून जन्माला येतात, तर पिलज सापांमध्ये, मादी पुरेशी वाढ झाल्यानंतर, पिल्लांना डायरेक्ट जन्म देते. त्यामुळे मेलेल्या सापांच्या रक्तातून नवीन साप निर्माण होणे ही एक भाकडकथा आहे.

१४. **नुकताच ठार मारलेल्या सापावर रॉकेल टाकले असता तो जिवंत होतो.**

**सत्य :** केरोसिनचा संपर्क ताज्या जखमेशी झाला असता, भयंकर वेदना होतात. याचाच भाग म्हणून (प्रतिक्षिप्त क्रिया) मरायला टेकलेल्या सापावर केरोसिन टाकले असता तो वेदनेने विव्हळतो व थोडी हालचाल करतो. परंतु ही क्षणिक गोष्ट असते. त्यामुळे साप जिवंत होत नाही.

१५. **देवाच्या सापावर (विशेषत:) नागावर केस असतात.**

**सत्य:** साप हे सरपटणाऱ्या प्राणी समूहातील असून त्यांच्या अंगावर केस निसर्गत: नसतात. त्याऐवजी दाखविण्यात येणारे केस हे बुवा, बाबा, मांत्रिक, गारूडी यांनी कृत्रिम पद्धतीने लावलेले असतात. त्यासाठी ते जीवंत सापांच्या अंगावर जखम करतात व शेळीचे केस त्यात अडकवतात जखम भरल्यानंतर ते केस सापाचेच असल्यासारखे भासतात. मग गारूडी याच सापांना देवाचे साप म्हणून पापभिरू भक्त मंडळींना दाखवितात व ते विश्वास ठेवतात. या सगळयांचा त्रास मात्र बिचाऱ्या सापाला होतो.

१६. **नाग धामणीसोबत मिलन/ समागम करतो.**

**सत्य :** सापांच्या प्रत्येक प्रकारात नर व मादी आढळून येतात. हे नाग व धामण या दोघांनाही लागू पडते. त्यामुळे नाग, धामण या सापासोबत मिलन करतो हे पूर्णत: असत्य आहे. कदाचित मराठीत नाग हा शब्द पुल्लिंगी व धामण

हा शब्द स्त्रीलिंगी या अर्थाने वापरला जातो त्यामुळे हा गैरसमज पसरला असावा. त्याचप्रमाणे मादीवरील हक्क सिद्ध करण्यासाठी, जेव्हा दोन नर धामण नृत्य करतात तेव्हा त्याच्या डोलण्यामुळे ते नागाप्रमाणे भासतात. खरं तर काही लोक यालाच गैरसमजूतीने नर व मादी धामण यांचे मिलन समजतात. आपल्या अधिक माहितीसाठी हे नक्की लक्षात घ्या की नाग हा साप शक्यतो धामण या सापाला खाऊनच गुजराण करतो.

**१७. गरोदर स्त्री व साप यांची नजरानजर झाल्यास सापांचे डोळे जातात.**
**सत्य :** वरील विधान ही पूर्वापार चालत आलेली अंधश्रद्धा आहे. आमच्या उरण येथील CON या संघटनेच्या सर्प मित्रांनी ह्या गोष्टीची सत्य/असत्यता स्वयंसेवकांद्वारे तपासून पाहिली असता ती असत्य असल्याचे सिद्ध झाले आहे. आपल्या समाधानासाठी आपण सुद्धा हा प्रयत्न करून पाहायला हरकत नाही. फक्त सापाची आणि सहभागी सदस्यांची योग्य काळजी घ्यावी.

**१८. साप शेपटीने डंख मारतो अथवा साप जिभेने चावतो.**
**सत्य :** साप जिभेने चावत नाही, कारण ती खुप मृदू असते. त्यामध्ये कुठल्याही प्रकारचे हाड नसते, जे कातडी छेदू शकेल. शेपटीबाबत पण काहीसे सारखेच असते. परंतु काही सापांच्या तिरकस काप असलेल्या बोथट शेपटीमुळे ते छोटी बिळे उकरू शकतात. काही सापांना मात्र शेपटीला काटा असतो व कधी-कधी ते बचाव करण्यासाठी तो टोचतात. पण त्यामध्ये विष नसल्याकारणाने जरी तो वेदनाकारक असला तरी अपायकारक नसतो.

**१९. साप शरीराचे वेटोळे करून चाकासारखे बनवितो व टेकडयांवरून खाली गरगरत येत माणसांचा पाठलाग करतो.**
**सत्य :** साप स्वसंरक्षणासाठी शरीराचे वेटोळे करतो. वर अपेक्षित असलेल्या गरगरत येण्याच्या प्रक्रियेसाठी आवश्यक असलेला तंदुरूस्तपणा सापामध्ये नसतो. त्यामुळे हा सर्व मानवी मनाच्या कल्पनाविलासाचा भाग आहे व पूर्णत: असत्य आहे.

**२०. सर्पदंश व त्यावरील उपायासंबंधित गैरसमज :**

१. सापांची पूजा केली असता अथवा त्यांच्या नावाने उपवास केला असता व्यक्तीचे सर्प दंशापासून किंवा सर्पविषाच्या अपायापासून संरक्षण होते. बाबा, बुवा, अम्मा, स्वामी, मांत्रिक यांच्याकडे ईश्वरा कडून प्राप्त केलेली दिव्य शक्ती असते. ज्याद्वारे ते सर्पविषाचा अपायकारक परिणाम कमी करू शकतात अथवा नष्ट करू शकतात. ही शक्ती हे बाबा लोक वर्षानुवर्षाच्या अभ्यास, पूजा व अथक परिश्रमाने प्राप्त करतात.
२. साप चावल्यास मंदिराला अथवा धर्मस्थळांना फेऱ्या घातल्याने, विषाचा होणारा अपायकारक परिणाम टाळता येतो.
३. मुंगूसाला सापाचे विष बाधत नाही अथवा साप चावल्यास तो विशिष्ट झाडाचा पाला/मूळ खाऊन स्वत:चा बचाव करतो.
४. कुष्ठरोग्यास साप चावत नाही अथवा चावला तरी बाधत नाही.
५. विषारी सर्पदंशानंतर "नागमणी" अथवा इतर तत्सम जडीबूटीचा उतारा केला असता विषाचा अपायकारक परिणाम होत नाही.
६. सर्पदंशाच्या जागी तापलेल्या लोखंडाचा चटका दिल्यास सर्पविष बाधत नाही.
७. मंत्रोपचाराने सर्पविष उतरवता येते.
८. सर्पदंश झालेल्या व्यक्तीस मिरच्या किंवा कडुनिंबाचा पाला गोड लागतो.

**सत्य :**
कृपया लक्षात ठेवा की, बिनविषारी व निमविषारी सर्पदशांचा मानवी शरीरावर होणारा परिणाम प्राणघातक नसतो, तसेच बहुतांश लक्षणे ही तात्पुरत्या स्वरूपाची असतात. परंतु विषारी सापांचा दंश हा प्राणघातक असला तरी योग्य वैद्यकीय उपचाराने ( प्रति सर्पविष लस -ASV) प्राण वाचविले जाऊ शकतात. या व्यतिरिक्त केले जाणारे सर्व उपाय हे विषारी सर्प दंशावर उपयोगी पडत नाहीत. परंतु बरेचसे सर्पदंश हे बिनविषारी किंवा निमविषारी सापांमुळे होत असल्याने, काही वेळाने रोगी आपोआप बरा होतो व श्रेय उगाचच अर्थहीन अंधश्रद्धांवर आधारलेल्या उपचारांना दिले जाते. विषारी

सर्पदंशानंतर योग्य उपचारात केलेली हेळसांड व विलंब, तसेच रोग्याला झालेला मानसिक व शारीरिक त्रास, विषाचा दुष्परिणाम वाढवितो.

मुंगूस हा अतिशय चपळ प्राणी असून सापाशी सामना करत असताना तो सर्पदंश न होण्याची काळजी घेतो. परंतु चुकून जर विषारी सापाचा दंश झाला तर मुंगूस मरू शकतो.

नागमणी म्हणून बाजारात विकल्या जाणाऱ्या स्फटिकांमध्ये कुठल्याही प्रकारचे विषाचा परिणाम कमी करणारे सामर्थ्य नसते.

मानवी व्रतवैकल्ये सापांच्या समजण्यापलीकडे आहेत. तसेच दंश करते वेळी टोचले गेलेले विष कुठल्याही पद्धतीने, साप परत काढू शकत नाही.

कुष्ठरोगाने बाधित व्यक्तीच्या स्पर्श आणि संबंधित संवेदना नाहीशा झालेल्या असतात त्यामुळे सर्पदंश व त्या अवयवांवरील वेदना रोग्यास जाणवत नाहीत. परंतु विषाचा शरीरावर अनिष्ट परिणाम मात्र होतोच व योग्य उपचाराच्या अभावी मृत्यू होऊ शकतो.

सापाच्या विषामुळे (विशेषत: नाग व मण्यार) दंश झालेल्या व्यक्तीच्या मज्जासंस्थेवर परिणाम होतो व त्याची संवेदनक्षमता कमी होऊ लागते त्यामुळे त्याला चव सुद्धा समजत नाही. त्यामुळे रूग्णास मिरची तिखट अथवा कडुनिंब कडू लागत नाही. याचा अर्थ असा नाही, की त्याला ते गोड लागते. कदाचित दंश पिडीत व्यक्तीस अशा परिस्थितीत साखरही गोड लागणार नाही.

वरील गैरसमज हे एकूण सर्प जमातीविषयी आहेत. परंतु प्रत्येक सापाबावत असलेले विशिष्ट गैरसमज प्रत्येक सापाबावतच्या अधिक विवेचनात आले आहेत.

**Important Note :** The symptoms of snake bite totally depend on type of snake, location of bite on victim body, severity of bite, quantity of injected venom, victim's mental & physical condition during & after bite and also his immunity.

## सर्पदंश टाळण्यासाठी घेण्याचे खबरदारीचे/सावधानतेचे उपाय:

साप हा जीव निसर्ग व मानव यांसाठी उपयुक्त असलातरीसुद्धा त्याच्या विषामुळे, त्याचा दंश हा भयावह व त्रासदायक ठरतो. विशेषत: विषारी सापांचा दंश. म्हणूनच एकंदर सर्पदंश होऊ नये म्हणून खबरदारी घेतलेली बरी. आपल्याला माहित आहे की उपायापेक्षा सावधगीरी कधीही चांगली. साप हे झाडीत किंवा अडगळीत म्हणजे दमट, अंधाऱ्या, ओलसर जागी राहणे पसंत करतात. हे लक्षात घेतल्यास सर्पदंश टाळण्यासाठी आपण खालील खबरदारी घेऊ शकतो. अर्थातच, गावाकडील ठिकाणी साप घरात, गोठयात किंवा आसपास येऊ नये म्हणून सुद्धा हे उपाय प्रभावी ठरू शकतात.

१. घराला लागून व आसपास पालापाचोळा, दगड, विटा, लाकडे, सरपण, गोवऱ्या यांचा ढीग रचू नये. शक्यतो घरात वरील सर्व साठविणे टाळावे.कारण या गोष्टी सापाला लपण्यासाठी उत्तम जागा उपलब्ध करून देतात.
२. वरील मुद्दयाला अनुसरून, दगड, विटा, सरपण, गोवऱ्या यांच्या ढीगाऱ्याखाली अथवा अडगळीच्या जागेत हात घालताना आधी व्यवस्थित पाहणी करून मगच पुढील कार्यवाही/कामे करावी.
३. उथळ पाण्यात, दलदलीच्या जागी, झाडीत वावरताना सुद्धा काळजीपूर्वक जागेची पाहणी करूनच उतरावे.
४. सापांना गुळगुळीत, सपाट पृष्ठभागांवर हालचाल करणे, सरकणे कठीण जाते, म्हणूनच घराच्या बाहेरील भींती, पाया व लगतचा काही मीटर परिसर सारवून अथवा रेती सिमेंट वापरून एकदम गुळगुळीत करावा. त्यामुळे साप घरात येऊ शकणार नाहीत व सर्पदंश टाळले जाऊ शकतील.

५. भिंती, कुंपण यांना तडा अथवा भोके पडली असल्यास व्यवस्थित बुजवून घ्यावीत. या जागा सुद्धा सापांना तात्पुरता निवारा देतात, त्याद्वारे साप घरात सुद्धा येऊ शकतात.
६. बाहेरील झाडावरील अथवा कुंपणावरील वेली व फांदया सरळ खिडक्यांना, छपरांना स्पर्श करणार नाहीत याची काळजी घ्यावी. हीच काळजी घरातील कुंडयांतील वेलींबाबत घ्यावी. यामुळे झाडसर्प घरात येण्यास थोडया-फार प्रमाणात मज्जाव होऊ शकतो.
७. जंगलात, निसर्गसहली निमित्त फिरताना Felt hat, full pant, full shirt, तसेच पाय पूर्ण संरक्षित करणारी पादत्राणे/बूट वापरावेत. Hand gloves, Shin guard, wrist guard यांचा सुद्धा वापर करावा. तसेच झाडाचा, फांदीचा, कपारीचा आधार घेण्यापूर्वी व्यवस्थित पाहणी करावी. शक्यतो हातात आधारासाठी व दुरून पाहणी करण्यासाठी मजबूत काठी बाळगावी.
८. निसर्ग सहली (Camping/trekking) दरम्यान राहण्याची आणि पाणी साठविण्याची/वापरण्याची जागा यामध्ये योग्य सुरक्षित अंतर ठेवावे. सदर ठिकाणी जाण्यासाठी विजेरीचा वापर करावा.
९. आपल्या घरापर्यंत येणारे साप हे शक्यतो, उंदीर, घुशी किंवा इतर भक्ष्यांचा माग काढत आलेले असतात. त्यामुळे घर विशेषत: स्वयंपाकघर स्वच्छ ठेवल्यास व टाकाऊ खाद्य पदार्थांची व्यवस्थित विल्हेवाट लावल्यास कृंतक प्राण्यांचा व अर्थातच सापांचा घरात शिरकाव होणे कमी होऊ शकते.
१०. जंगल सफरीवरून घरी आल्यावर सर्व सामान व्यवस्थित तपासून घ्यावे, नाहीतर जंगलातून तुमच्या बॅगेत व बॅगेतून तुमच्या दहाव्या माळयावरील घरात साप सहज पोहचू शकतात.
११. शहर वस्तीत राहणाऱ्या, विशेषत: तळमजला व पहिल्या मजल्यावरील रहिवाश्यांनी आपल्या घरापर्यंत येणारे व घरापासून निघणारे सर्व पाईप फिनाईल ने स्वच्छ ठेवल्यास त्याद्वारे साप घरात पोहोचण्याची शक्यता फार कमी होते.
१२. रस्त्यात अथवा एखादे ठिकाणी साप मेलेला आहे असे वाटल्यास एकदम स्पर्श करण्याची वा हाताने उचलण्याची घाई करू नये. लांब काठीने तो मेलेला आहे याची खात्री करून योग्य, सुरक्षित पद्धतीनेच त्याची हाताळणी करावी.

## सापाशी सामना झाल्यास काय कराल?

वरील सर्व काळजी, खबरदारी घेऊन सुद्धा सापांच्या मुबलकतेमुळे म्हणा नाहीतर आपल्या निसर्गावरील अतिक्रमणामुळे, नैसर्गिक योगायोगाने जर सापांशी आपला सामना झालाच, तर खालील मुद्दे नक्की लक्षात ठेवा:

१. सर्पमित्रास पाचारण करावे. सर्पमित्रांचा अनुभव आणि अभ्यासपूर्ण माहिती परिस्थिती हाताळण्यास बराच हातभार लावते.
२. सापापासून सुरक्षित अंतर ठेवावे.
३. शक्य असल्यास दूरूनच विजेरीचा उपयोग करून साप ओळखण्याचा प्रयत्न करावा.
४. सापाला पळवून लावण्यासाठी लांब काठीचा उपयोग करावा.
५. शक्यतो सापाला मारण्याचा प्रयत्न करू नये, अनुभव नसलेल्या व्यक्तीने तर साप पकडण्याचा अथवा मारण्याचा बिलकुलसुद्धा प्रयत्न करू नये. योग्य मदत येईपर्यंत वाट पाहावी.
६. आपण पाहिले की साप हा हालचालींचा वेध घेत असतो, त्यामुळे अतिजवळच्या प्रसंगामध्ये शक्यतो शांत राहून, कमीत कमी हालचाल करून सापापासून दूर जाण्याचा प्रयत्न करावा अथवा तुम्ही शांत राहिल्यास, सापच परिस्थितीचा अंदाज घेऊन स्वत: दूर निघून जाईल.

समजा तुम्हांला किंवा तुमच्या आजुबाजूच्या कोणाला यदा कदाचित् सर्प दंश झाल्यास अशा व्यक्तीस लवकरात लवकर उपचार करण्यासाठी दवाखान्यात नेण्याचा प्रयत्न करावा. माहिती अभावी घाबरून न जाता दरम्यानच्या काळात खालील प्रथमोपचार केल्यास अथवा खालील काळजी घेतल्यास पीडित व्यक्तीस शारीरीक व मानसिक आधार मिळून बहुमोल मदत होऊ शकते.

१. सर्पदंश झालेल्या व्यक्तीचा भीतीने तोल जातो. त्यामुळे सर्वप्रथम त्याला/तिला धीर द्यावा व त्याच्या सुरक्षिततेची हमी द्यावी.

२. रोग्यास कुठल्याही प्रकारचे शारीरीक/मानसिक श्रम न होऊ देता, शांत पडून राहावयास सांगावे, अथवा तशी योग्य व्यवस्था करावी.
३. वरील अवस्थेत, सर्पदंश झालेला अवयव हृदयाच्या पातळीपेक्षा खालच्या पातळीवर 'आधार देऊन' स्थिर ठेवावा.
४. दंश झालेली जागा/जखम हळूवारपणे जंतुनाशकाने स्वच्छ करावी.
५. नाग किंवा मण्यार यांचा दंश झाला असल्यासच, माहितगार व्यक्तीकडून आवळपट्टी बांधावी, थोडया थोडया वेळाने सैल करून पुन्हा बांधावी. घोणस, फुरसे वर्गातील सर्पदंशात आवळपट्टी बांधू नये.
६. शक्यतो जखमेवर ब्लेडने/धारदार वस्तूने कापून घेऊ नये. अधिक रक्तस्त्राव होऊन जीवास धोका उत्पन्न होऊ शकतो. लवकरात लवकर उपचार करण्यासाठी दवाखान्यात न्यावे.
७. मांत्रिक, बाबा, हाकीम, वैदय यांच्याकडे रोग्यास नेऊ नये. सर्पदंशावर "प्रतिसर्प विष" हाच खातरीलायक उपाय आहे. हे औषध सर्व सरकारी रूग्णालयांत उपलब्ध असते. सर्पदंशावर उपाय करण्यासाठी चावलेला साप, पकडून किंवा मारून रूग्णालयात नेण्याची बिलकूल गरज नसते. त्यामुळे हा भीमपराक्रम करणे टाळावे.
८. रूग्णालयात पोहोचल्यावर संबंधित डॉक्टरांना रूग्णाच्या इतर आजारांबाबत अथवा औषधांच्या ॲलर्जीबाबत पूर्ण माहिती दयावी.

**सापांचे संरक्षण आणि कायदा :**

सापांचे रक्षण करणारा "वन्यजीवन संरक्षण कायदा" १९७२ पासून अस्तित्वात आहे. या कायद्यानुसार साप पकडणे, बाळगणे, मारणे हा कायद्यानुसार गुन्हा आहे. कोणताही जंगली प्राणी पाळण्यापूर्वी त्यासंबंधी परवाना घेणे आवश्यक आहे. या कायद्यासोबतच १९७५ सालचा "निर्यात धोरण - वन्य जीवांपासून उत्पन्नाविषयीचा कायदा" सुद्धा सापांना संरक्षण मिळवून देतो. अर्थातच फक्त कायदा पुरा पडणार नाही. त्यासाठी लोकशिक्षण हवेच व तोच या पुस्तकाचा प्रमुख हेतू आहे. जंगलांचे संरक्षण व संवर्धन हेच खऱ्या अर्थाने वन्यजीवांचे व आपल्या सृष्टीचे रक्षण आहे. त्यासाठी शासनाने व शासकीय यंत्रणेने अधिक लक्ष देण्याची गरज आहे.

**साप ओळखण्यासाठीचा मुलभूत सराव :**

साप ओळखण्याची गरज तर आपल्या लक्षात आलीच आहे, त्यायोगे आपण सापांचे व स्वत:चेही संरक्षण करू शकतो. म्हणूनच काही विशेष सापांविषयी सखोल माहिती करून घेण्याआधी आपण साप ओळखण्याचा अभ्यास करण्यासाठी आवश्यक मुद्दे / सरावाच्या गोष्टी लक्षात घेऊ या. परंतु त्या आधी प्रत्येक साप हा पुस्तकांत सांगीतलेल्या वर्णनाशी किंवा फोटोशी तंतोतत जुळेल असे नाही. राहण्याची जागा, अनुरूप परिस्थितीला पूरक असे बाह्यस्वरूप साप अवलंबतात, हे वाचकांनी विसरता कामा नये.

- सापांविषयी चांगली पुस्तके जरूर वाचा, काही महत्वाची अभ्यासपूर्ण पुस्तके आम्ही नमूद केली आहेत.ही पुस्तके विकत घेऊन आवश्यकते नुसार reference म्हणून वापरली जाऊ शकतात.
- सापांविषयी माहिती देणाऱ्या इंटरनेट वरील संकेत स्थळांना भेट द्या. आवश्यक माहिती, फोटो डाऊनलोड करा व त्याचा अभ्यास करा. Internet अथवा CD माध्यमाद्वारे सापांच्या चित्रफीती पाहून सापांचे त्यांच्या नैसर्गीक राहणीमानात निरीक्षण करा.
- प्रत्यक्ष साप पाहण्यासाठी 'राष्ट्रीय उद्याने', 'सर्प उद्याने' इत्यादी ठिकाणांना आवर्जून भेट द्या. उदा.कात्रज-पुणे किंवा चेन्नई सर्पोद्यान.
- साप हाताळण्याचा अनुभव घेण्यासाठी व सापांबद्दलची भीती कमी करण्यासाठी सर्पमित्र/सर्पप्रेमी/निसर्गप्रेमी संघटनांच्या संपर्कात रहा.
- अनुभव वाढविण्यासाठी व कौशल्य प्राप्त करण्यासाठी वरील प्रकारच्या संस्थांमध्ये/संस्थांसाठी स्वयंसेवकाचे काम करा.

- आपले निसर्ग प्रेम/वन्यजीव प्रेम/सर्पप्रेम या सर्वांना दिखावेपणा पासून दूर ठेवा. घरात किंवा वस्ती ठिकाणी आढळलेल्या सापांची सुटका, हाताळणी व पुनर्वसनासाठी ही फार आवश्यक बाब आहे. आपण पाहिले आहे की आपल्या परिसरातील बहुतांश साप हे बिनविषारी किंवा निमविषारी असतात. त्यामुळे सर्पदंशामुळे होणारी मानसिक व शारीरीक हानी ही त्याच्या विषयी असलेल्या माहितीच्या अभावामुळे व भीतीमुळे होते. म्हणूनच भीती व गैरसमजूतीची सर्व बंधने दूर सारून प्रयत्न करू या, या सुंदर जीवांना समजून घेण्याचा.

**विषारी साप :**

१. **नाग :** भारतात आढळणाऱ्या प्रमुख चार विषारी सापांच्या प्रजातींपैकी 'नाग' हा एक प्रमुख साप आहे. तो जगप्रसिद्ध आहे त्याच्या विषासाठी व त्याच्या फण्यासाठी. फणा हे त्याच्या बचावाचे प्रदर्शन असते. नाग हे अंडज साप आहेत.

१) **भारतीय चष्मा नाग :** चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'भारतीय चष्मा नाग' आहे. या सापाची लांबी ३ ते ७ फूट दरम्यान असते. सामान्यत: सर्व अंग गर्द तपकिरी, पिवळट पांढऱ्या रंगाचे किंवा काळे असते. मानेच्या खालच्या बाजूवर रूंद पट्टा असतो. अंगावर पांढरे ठिपके अथवा पिवळया रंगाची नक्षी असते. या नागाच्या फण्यावर अंगठी सारखी दिसणारी दोन चिन्हे असतात. कधी कधी ती चष्म्यासारखी किंवा १0 च्या आकडयासारखी भासतात. फणा मिटलेला असताना हा साप धामणीसारखा दिसतो. परंतु धामण या सापापेक्षा लांबीने थोडी जास्त असते. तिचे डोके व मान चपटी असते. हा साप संपूर्ण भारतभर आढळतो. मुख्य वास्तव्य भातशेती परिसरात असते. कारण त्यांचे खाद्य उंदीर, बेडूक, धामण यांचेही वास्तव्य येथेच असते. डिवचल्यास तात्काळ फणा काढतो व गळयातून हिस्स-हिस्स असा आवाज काढतो .





Please follow link below to see video's on you tube for Spectacled Cobra –

http://www.youtube.com/watch?v=N77xk79MJ0c

http://www.youtube.com/watch?v=jYTK6j-6L68

http://www.youtube.com/watch?v=W_o4KgTjTVg

http://www.youtube.com/watch?v=AVwUIOg3MjY

२) **एकाक्ष नाग :** चित्रामध्ये दाखवलेला साप हा 'भारतीय एकाक्ष नाग' आहे. हा भारताच्या उत्तर-पूर्व परिसरात म्हणजे, ओरीसा, बंगाल, आसाम, अरूणाचल प्रदेश या ठिकाणी आढळतो. याला 'बेंगॉल नाग' असेही म्हटले जाते. या सापांचे विष चष्मा नागापेक्षा कमी जहाल असते. फणा गोलाकार व लहान असतो. फण्यावर एक गोलाकार, स्पष्ट खुण असते. रंगाने हा पिवळसर हिरवट, तपकिरी रंगाचा असतो. हा साप निशाचर असून, डिवचल्यास आक्रामक पवित्रा घेतो.



३) **नागराज :** पुढील पानावरील चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'नागराज' आहे. हा साप लांबीने ९ ते १४ फूट लांब असू शकतो. तो भारतातील सर्वात लांब विषारी साप आहे. त्याच्या मोठया आकारामुळे विषाची मात्रा सुद्धा खुप असते. त्याच्या वापराने एक पूर्ण वाढ झालेला हत्ती अथवा ३0-३२ माणसे सहज मृत्यूमुखी पडू शकतात. हा साप भारतातील घनदाट जंगलांत बंगाल, ओरिसा, कर्नाटक, तामिळनाडू, उत्तर-पूर्वेकडील राज्ये अथवा चहाचे मळे येथे आढळतो. यांच्या उदरनिर्वाहाचे मुख्य साधन साप हेच असते. यांचा फणा चष्मा नागाप्रमाणे पण अरूंद व खूप लांब असतो. हा साप फणा काढून ३ ते ४ फूट उभा राहू शकतो. यांचा रंग पिवळट किंवा गर्द शेवाळी असतो. शेपटी काळपट असते. नागराज सापांची मादी अंडयांसाठी घरटे बांधते. त्यासाठी झाडांची पाने खरवडून एकत्र करते व ढीग रचते. अंडी उबेपर्यंत घरटयाजवळच राहते.



Please follow link below to see video's on you tube for King Cobra –

http://www.youtube.com/watch?v=3Rj7ff2A2XI

http://www.youtube.com/watch?v=c6yw28oTPwE

**नागदंश परिणाम / लक्षणे :**

नागाचे विष माणसाच्या मज्जासंस्थेवर परिणाम करते. प्रमुख लक्षणांमध्ये, दंश झालेल्या जागी जळजळ होऊन सूज येते, अंग जड झाल्यासारखे वाटते. झोप येते व हातपाय गळल्यासारखे वाटतात. डोळयांच्या पापण्या जड होऊन मिटू लागतात. तोंडातून लाळ गळू लागते, घाम फुटतो, श्वास घेणे जड जाते. हृदयाचे ठोके वाढतात. रूग्ण शुद्ध हरपतो. योग्य उपचाराअभावी मृत्यू संभवतो.

**नागाविषयीचे गैरसमज :**

१. दूध हे नागाचे मुख्य खाद्य आहे.
२. नागाला संगीत आवडते अथवा तो पुंगीच्या तालावर डोलतो.
३. काही विशिष्ट ठिकाणी, विशिष्ट दिवशी नाग, त्यांना अर्पण केलेले दूध पिण्यासाठी येतात.
४. नागाच्या डोक्यावर नागमणी असतो.
५. नागमणीचा स्पर्श नागदंश झालेल्या ठिकाणी केल्यास, सर्प विष बाधत नाही.
६. नागपंचमीला नाग दंश झाल्यास त्यावर उपाय होत नाही.
७. नाग धामण या सापासोबत समागम करतो.
८. वडिलोपार्जीत शेतीवाडीचे संरक्षण करण्याचे काम नाग, त्याच्या आसपास राहून करतो.
९. नाग जुना झाल्यास, त्याला पाच तोंडे येतात अथवा अनेक वर्ष तपश्चर्या करून नागीण (नागाची मादी) इच्छाधारी बनू शकते.

**२. मण्यार** : 'बडे चार' समुदायातील एक सदस्य मण्यार आहे. या सापाचे विष अत्यंत जहाल असते. असे म्हणतात की, त्याचे विष नागापेक्षा ५ ते ८ पट तीव्र असते. हे साप अंडज व निशाचर असतात. महाराष्ट्रातील रायगड /कोकण परिसरात याला 'सूर्यकांडर' असेही म्हटले जाते.

१) **मण्यार :** पुढील पानावरील चित्रामध्ये दाखवलेला साप हा सगळीकडे सहजपणे आढळणारा सामान्य मण्यार साप आहे. या सापांचा रंग निळसर काळा असतो. त्यांच्या अंगावर पांढऱ्या रंगाचे मानेनंतर सुरू झालेले, परंतु शेपटी पर्यंत गेलेले बारीक पट्टे असतात. हा साप प्रथमदर्शनी 'कवडया' सापाप्रमाणे दिसतो. परंतु कवडया सापाच्या डोक्यापासून पट्टे असतात. तसेच कवडया सापाचे डोके त्रिकोणी, चपटे व मान डोक्यापेक्षा बारीक असते. मण्यार सापाचे डोके गोल असते व पाठीच्या मधोमध असलेले खवले षटकोनी आकाराचे असतात. या सापाची लांबी ३ ते ६ फूट असते. हा साप इतर लहान साप खाऊन आपली गुजराण करतो.



Please follow link below to see video's on you tube for Krait –

http://www.youtube.com/watch?v=UkzwSiJx4pk

http://www.youtube.com/watch?v=QOwqCoGzdp0

२) **पट्टेरी मण्यार** : चित्रामध्ये दाखविण्यात आलेला साप हा 'पट्टेरी मण्यार' सर्प आहे. गडचिरोली, चंद्रपूर तसेच बंगाल, ओरिसा, आसाम येथे हा साप सापडतो. मा. डॉ. प्रकाश आमटे यांच्या "लोकबिरादरी प्रकल्प" भेटी दरम्यान हा साप प्रत्यक्षात पाहायला मिळाला होता. 'आग्या मण्यार' म्हणून ओळखला जाणारा हा साप, सामान्य मण्यारापेक्षा जास्त विषारी असतो. परंतु तितकाच शांत स्वभावाचा आहे. त्याची लांबी ४.५ ते ७ फूट असते. त्याच्या त्रिकोणी शरीरावर पिवळे व काळे पट्टे असतात. डोक्यावर उलटया 'V' आकाराचे चिन्ह असते. हा साप सुद्धा निशाचर आहे.



३) **वॉलसिंद मण्यार** : हा साप सामान्य मण्यार सारखाच असतो. तो महाराष्ट्र, उत्तरप्रदेश, बिहार व बंगाल मध्ये सापडतो. हा सामान्य मण्यार पेक्षा जास्त चिडखोर व आक्रमक वृत्तीचा साप आहे.

**मण्यार दंश लक्षणे / परिणाम** :

मण्यार सापांचे विष सुद्धा नागाच्या विषाप्रमाणे माणसाच्या मज्जासंस्थेवर परिणाम करते. परंतु दंश झालेल्या जागी विशेष वेदना अथवा सूज लवकर न आल्यामुळे पीडित व्यक्ती गाफील राहते. ही लक्षणे हळूहळू दृश्य स्वरूप दाखवतात व नंतर झपाटयाने वाढतात. काही वेळाने सांध्यांमध्ये व पोटात भयंकर वेदना सुरू होतात. योग्य उपचाराअभावी रूग्णाची श्वसनसंस्था निकामी होऊन रूग्ण दगावण्याची शक्यता असते.

**मण्यार गैरसमज** : मण्यार हा साप रात्री चावल्यास, सूर्य उगविण्याआधी व दिवसा चावल्यास सूर्य मावळण्याआधी रूग्ण दगावतो. म्हणूनच या सापाला सूर्यकांडर म्हटले जाते. वास्तवत: या सापांचे विष एवढे जहाल असते की दंश झाल्यानंतर काही तासातच मृत्यू संभवतो.

३. **घोणस** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'घोणस' आहे. त्यास कोकण, रायगड परिसरात 'कांबळया'/ 'कांबळयाजोगी' म्हटले जाते. घोणस हा शरीराने लठ्ठ व बोजड साप आहे. परंतु तो कमालीच्या वेगाने हल्ला करतो. त्याच्या अंगावर साखळीसारखी चित्राकृती असते. त्याचे डोके त्रिकोणी व चपटे असते. त्याचे विषदंत जबडयात दुमडून बसविलेले असतात. ह्या सापाची लांबी ३ ते ६ फूट असते. डिवचला असता तो हिस्स-हिस्स असा आवाज करून फुत्कार सोडतो व स्वत:चा बचाव करण्यासाठी कडाडून चावतो. इतर जातीचे साप, सरडे, उंदीर, विंचू यांवर तो गुजराण करतो. तसा हा

निशाचर साप कधी कधी दिवसा सुद्धा नजरेस पडतो. घोणस हा सुद्धा 'बडे चार' समुदायाचा सदस्य आहे व सर्वत्र आढळतो. घोणस हा पिलज म्हणजेच पिलांना डायरेक्ट जन्म देणारा साप आहे. त्यांच्या राहत्या जागेनुसार त्यांच्यावरील रंगाकृतीच्या छटा बदलतात.

**घोणस दंश लक्षणे / परिणाम :**

घोणस या सापाच्या विषाचा परिणाम माणसाच्या रक्तावर व रक्त संस्थेवर होतो. दंश झालेल्या जागी प्रथम जळजळ सुरू होऊन नंतर तीव्र व भयंकर वेदना त्या संपूर्ण अवयवावर पसरते. दंश झालेला भाग हिरवट निळसर होऊन सुजू लागतो. कधी कधी फोडी येतात व आंतरिक रक्तस्त्राव होतो. दंश झालेल्या भागातून, हिरडीतून, लघवीतून, रक्तस्त्राव सुरू होतो. त्यामुळे रूग्णास अशक्तपणा येतो. नाडीचे ठोके अनियमित होतात. पोटात मळमळते, रूग्णास अस्वस्थपणा जाणवू लागतो. या सर्प दंशामध्ये, ब्लेडने काप घेणे अथवा आवळपट्टी बांधल्याने अतिशय विपरीत परिणाम होऊ शकतो. म्हणून या दोन्ही ही गोष्टी नक्की टाळाव्या. योग्य उपचाराअभावी किडनीचे (मुत्रपिंडाचे) कार्य बंद होऊ शकते.



Please follow link below to see video's on you tube for Russell's Viper –

http://www.youtube.com/watch?v=6MSRiCK7w8U

http://www.youtube.com/watch?v=Q0xTG5B9rF0

http://www.youtube.com/watch?v=rFWZEMhcA5c

http://www.youtube.com/watch?v=GEYB21rjdzM

http://www.youtube.com/watch?v=G9eUtRl1RhY

**गैरसमज :** या सापांविषयी असा गैरसमज आहे की हा साप चावताना जर पाठीवर फिरला नाही तर याचे विष मानवी शरीरात टोचले जात नाही. परंतु सत्य हे आहे की ह्या सापांचे विषदंत यांच्या जबड्यात दुमडून बसलेले असतात. त्यामुळे दंश करते वेळी हा साप जबडा पूर्ण उघडतो व दंश करतो. परंतु त्याचे विषदंत प्राण्याच्या शरीरातून काढण्यासाठी त्याला किंचीत पाठीवर फिरावे लागते. याचा विष टोचले जाण्याशी किंवा त्याच्या प्राणघातक परिणामांशी काही संबंध नाही.

**४. फुरसे** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'फुरसे' आहे. हा 'बडे चार' गटातील सर्वात छोटा सभासद असला तरी बहुतांश सर्प दंशाला जबाबदार आहे. या सापाची मादी घोणशी प्रमाणे पिल्लांना जन्म देते. या सापांची लांबी १ ते २ फूटच असते. मानेपेक्षा डोके बरेच मोठे व चपटे असते. पाठीवरील खवले कणीदार असतात. डोक्याच्या मध्यभागी बाणासारखी

दिसणारी आकृती असते. शरीराच्या मानाने शेपूट फारच आखूड असते. पाठीच्या दोन्ही कडांवर असलेली खवले घासुन तो फुस्स-फुस्स असा आवाज करतो .फुरसे ओळखण्याची मुख्य खुण म्हणजे त्यांची वेलांटी चाल. हा साप मान उचलून तिरकी पुढे सरकवतो, त्यामुळे मानेबरोबर त्यांचे शरीर त्या दिशेस फेकले जाते. त्यामुळे तो तिरका सरपटताना दिसतो. त्याच्या अंगावर नागमोडी चित्राकृती असते. हालचालीमध्ये अतिशय चपळता दिसते. फुरसे उंदीर, सरडे, छोटे पक्षी, विंचू खाऊन गुजराण करतात. उत्तर पूर्व भारतातील काही प्रांत व जम्मू काश्मीर वगळता, सर्वत्र हा साप आढळतो.




Please follow link below to see video’s on you tube for Saw Scaled Viper –

http://www.youtube.com/watch?v=ohU7DXavOlE

http://www.youtube.com/watch?v=yn6jX1QKgCg

**फुरसे दंश लक्षणे/परिणाम :** फुरसे या सापाच्या विषाचा मानवी शरीरावरील परिणाम, हा घोणस या सापाप्रमाणे म्हणजे रक्त व रक्तसंस्था यांच्याशी निगडीत असतो. बहुतांश लक्षणे घोणस सर्पदंशाप्रमाणेच असतात. परंतु फुरसे घोणशीपेक्षा लहान असल्याने दिसणारी लक्षणे व होणारे परिणाम हे अतिजलद व अतिघातक नसतात. परंतु योग्य उपचारा अभावी बाह्य व अंत: रक्तस्त्रावामुळे, अथवा हृदयक्रिया बंद पडून रोगी दगावू शकतो.

**गैरसमज :** काही लोकांना फुरसे हा साप बिनविषारी आहे, असा गैरसमज असतो. तरीसुद्धा रायगड, कोकण परिसरात डुरक्या घोणस यांस फुरसे समजून सर्रास मारले जाते.

५. **चापडा** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा ‘चापडा’ आहे. या सापाला ‘हरा नाग’ , ‘वेणु नाग’, ‘सरंध्र नाग’ किंवा ‘हिरवा घोणस’ म्हणून सुद्धा संबोधण्यात येते. बांबूच्या किंवा दाट झाडी-झुडपात आढळणारा हा एक घोणसाचा प्रकार आहे. या सापाच्या नाकपुडया व डोळे यांमध्ये छोटासा उष्णता संवेदनक्षम/उष्मग्राही खळगा असतो. अजगराप्रमाणेच या सापालासुध्दा उष्णरक्तीय भक्ष्य टिपण्यात याचा उपयोग होतो.




Please follow link below to see video’s on you tube for Bamboo Pit Viper –

http://www.youtube.com/watch?v=WYfv5hvJrIw

तापमानातील फरक जाणण्याची संवेदनक्षमता ०.००0३ अंश सेल्सियस एवढी तीक्ष्ण असू शकते. या सापाचे डोके त्रिकोणी व चपटे असते. मान बारीक असते. शरीराचा वरचा भाग हिरवा-पोपटी तर खालचा भाग पिवळसर असतो. या सापाची लांबी १ ते ३ फूट असते. हा निशाचर साप पिल्लांना जन्म देतो. पश्चिम घाटात, महाराष्ट्रापासून कन्याकुमारीपर्यंत सापडणारे 'मलबारी चापडा' व 'नाकडया चापडा' हे दोन साप आढळतात. तपकिरी शरीरावर हलक्या व गडद रंगाच्या खुणा हे मलबारी चापडयाचे रंगविशेष आहे. राखाडी किंवा फिक्कट तपकिरी शरीरावर गडद छोटे तपकिरी पट्टे ही नाकडया चापडयाची ओळख आहे. इतर सर्व सवयी व शारीरीक गुणविशेष चापडा सापाशी मिळते जुळते असतात.

**चापडा दंश लक्षणे/परिणाम :**

चापडा हा घोणसाचाच एक प्रकार असल्याने, दंश लक्षणे व परिणाम हे घोणस सर्प दंशाशी मिळते जुळते असतात. परंतु या सापाचे विष जास्त जहाल नसल्याने, मृत्यू क्वचितच संभवतो. तरीही खबरदारी म्हणून योग्य वैद्यकीय उपचार नक्की घ्यावे.

**६. पोवळा सर्प** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'पोवळा सर्प' आहे. त्यास 'रातसर्प' असेही म्हटले जाते. त्याचे शरीर तपकिरी रंगाचे असते. खालील बाजूचा रंग पोवळया प्रमाणे भडक असतो. डोके व शेपटी बोथट व आखूड असतात. शेपटीच्या ठिकाणी दोन काळया वर्तुळाकार अंगठी प्रमाणे खुणा असतात. शेपटीच्या खालील भागाचा रंग निळसर असतो. या सापाची लांबी १ फूटाच्या आसपास असते. हा साप 'काळतोंडया' या बिनविषारी सापाप्रमाणे दिसतो. हा निशाचर साप अंडज असून, डिवचल्यास शेपटी उंचावून खालील भडक रंग दर्शवितो. हा साप भारतात बहुसंख्य ठिकाणी आढळतो.



पोवळा सापांचा पश्चिमेकडील जंगलात सापडणारा एक प्रकार म्हणजे 'पट्टेरी पोवळा' सर्प आहे. याचे शरीर बारीक असून लांबी ३ ते ३.५ फूटापर्यंत असते. डोके काळे असते. शरीरावर काळया, लाल किंवा तपकिरी रंगाचे पट्टे असतात. शेपटी खालील खवले लाल व मोत्यासारख्या पांढऱ्या रंगाची असतात.

**पोवळा सर्प दंश लक्षणे/ परिणाम** : दंश झालेल्या जागी सूज येते व बारीक जळजळ होते. हा साप विषारी असल्याने उपचारात हलगर्जीपणा करू नये.

**७. समुद्रातील साप** : बहुतांश खाऱ्या पाण्यातील सर्प हे अतिशय विषारी असतात. भारताच्या किनारपट्टी परिसरात ह्या सापांच्या ३५ ते ४0 प्रजाती आढळतात. ह्या सापांचे विष नागाच्या चार ते आठ पट जहाल असते. स्वभावाने अतिशय शांत असलेले हे साप सहसा चावत नाहीत. पूरक परिस्थितीमध्ये ते १.५ ते २ तास श्वास रोखू शकतात. यातील प्रामुख्याने दर्शन देणाऱ्या सापांची माहिती खाली दिली आहे. हे सर्व साप पिलज आहेत.



- **समुद्रसर्प** : भारताच्या समुद्रकिनारी प्रामुख्याने आढळणारा हा सर्वसामान्य समुद्रसर्प आहे. याचे शरीर हिरवट राखाडी असून अंगावर गडद हिरवट रंगाचे पट्टे असतात. पोटावरील खवले मळकट पांढऱ्या रंगाची असतात. खवले कणीदार असून शेपटीचा आकार चपटा, वल्ह्यासारखा असतो. वरचा जबडा हा खालच्या जबडयापेक्षा मोठा असतो व नाक चौकोनी बाकदार असते .

- **समुद्री मण्यार** : काळे किंवा गडद राखाडी डोके असलेल्या ह्या सापाच्या राखाडी शरीरावर, पिवळसर पांढरे पट्टे असतात. लांबी ३ ते ४ फूट असते. हा आपल्या चपटया शेपटीचा उपयोग वल्ह्यासारखा करतो.

  Please follow link below to see video's on you tube for Sea Krait –

  http://www.youtube.com/watch?v=QVgITTIVHZU

- **खुजा समुद्रसाप :** समुद्री मण्यार प्रमाणे दिसणाऱ्या या सापाच्या पिवळया शरीरावर राखाडी बाकदार पट्टे असतात. शरीर आखूड व मजबूत असते. शेपटी गडद रंगाची व चपटी असते. या सापाची लांबी २ ते २.५ फूट असते. मासे हे समुद्रसापांचे मुख्य भक्ष्य आहे. म्हणूनच त्यांच्यासारखे चपळ भक्ष्य पटकन मलूल व्हावे म्हणून या सापांचे विष अति जहाल असते.

**समुद्र सर्प दंश लक्षणे/परिणाम :**

समुद्र सर्पाच्या दंशाने स्नायूंमध्ये वेदना होतात व अवयव लूळा पडतो. काही तासांतच लघवी लाल होते.

**गैरसमज** : समुद्र साप हे विनविषारी असावेत, या गैरसमजूतीमुळे कोळयांना त्यांची भिती वाटत नाही. माशांच्या जाळयात सापडलेल्या या सापांची शेपटी पकडून कोळी विनधास्त त्यांना समुद्रात पुन्हा फेकून देतात. परंतु खरे पाहता हे साप भयंकर विषारी असतात व त्यांचा दंश प्राणघातक ठरू शकतो.

## २ . निमविषारी साप :

१ . **हरणटोळ** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'हरणटोळ' आहे . यास 'तण साप' किंवा 'वेल्या साप' असेही म्हटले जाते . हा साप १ ते ७ फूट लांबीचा असतो . रंग पोपटी हिरवा, डोके लांब, चिंचोळे व नाजूक असते .





डोळयाची वाहुली आडवी असते . डोळयांचा रंग पिवळा असतो . विषदंत वरच्या जबडयाच्या मागच्या बाजूस असतात . कुठल्याही झाडाझुडुपांवर, वेलींवर हा आढळतो, परंतु रंगसंगतीमुळे दिसत नाही . हे साप पिलज असून मादी पिल्लांना जन्म देते . चवताळल्यास शरीर फुगवतो, जबडा वासतो . याचे विष सौम्य असल्याने मानवास अपायकारक नसते .

खालील चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'तपकिरी हरणटोळ' असून, तो सुकलेल्या वेलीप्रमाणे दिसतो . शरीर हलके तपकिरी किंवा राखाडी असते व त्यांवर गडद तपकिरी रंगाचे ठिपके असतात . डोके हिरव्या हरणटोळीपेक्षा लांब, चपटे व नाजूक असते . या सापाची लांबी ४ ते ५ फूट असते .



**गैरसमज** :

१) हरणटोळ हा साप माणसाच्या डोक्यावर उडी मारून टाळू खातो .

२) हरणटोळ हा साप माणूस दिसताच, त्यावर झडप घालून त्याचे डोळे फोडतो .

खरे पाहता हा साप अतिशय नाजूक असतो . त्यामुळे ज्या मानवी शरीराची कवटी उघडण्यासाठी तज्ञ डॉक्टरांना हातोडा वापरावा लागतो, ते डोके फोडणे हे या सापांचे काम नव्हे . हा साप झाडावर राहत असल्याने वरील दोन्ही गैरसमज निर्माण झाले असावेत .

२ . **मांजऱ्या साप** : चित्रामध्ये दाखविलेला साप 'मांजऱ्या सर्प' आहे . या सापाला असे विशिष्ट नाव मिळण्याचे कारण हे की, ते निशाचर प्रवृत्तीचे असून त्यांच्या डोळयांची वाहुली मांजरीच्या डोळयाप्रमाणे उभी असते . हे साप बारीक व लांबट असतात . त्यांचे रंगरूपावरून अनेक प्रकार आढळतात . जसे 'सेलोनी मांजऱ्या सर्प', 'वेडोमचा मांजऱ्या सर्प' व 'फॉर्स्टनचा मांजऱ्या सर्प' .






Please follow link below to see video's on you tube for Forsten Cat Snake –

http://www.youtube.com/watch?v=JUnY3hJtYGM

http://www.youtube.com/watch?v=uHLlfJqEFHo

http://www.youtube.com/watch?v=TluIX6U97wc

http://www.youtube.com/watch?v=PS0ui93vXq0

http://www.youtube.com/watch?v=yJJXcwT0N9E

http://www.youtube.com/watch?v=mheBD33u0F4

http://www.youtube.com/watch?v=JJm0YX6cHzw

http://www.youtube.com/watch?v=8Mx4J9-Oo6s

http://www.youtube.com/watch?v=d1vNmehkmrY

हे सर्व निशाचर साप, अंडज आहेत. या सापांची लांबी २ फूट ते २ मीटर पर्यंत असू शकते. यातील सर्व सापांचा दंश अपायकारक नसला तरी फारच वेदनादायी असतो. यांतील सर्व प्रकारांचा विचार केल्यास काश्मीर खोरे वगळता हा साप सर्वत्र आढळतो. बऱ्याचदा या सापांची गफलत 'फुरसे' या विषारी सापासोबत केली जाते. पण हा साप फुरश्याच्या मानाने सडपातळ व बराच लांब असतो. या सापाचे डोके चपटे असून, डोक्याच्या मानाने मान फार बारीक असते. शेपटी लांब असते. अंगावर ठळक नक्षी असते. याची चाल नागमोडी असते. सरडे, सापसुरळी, लहान उंदीर हे त्यांचे अन्न आहे. वरील चित्रामध्ये दाखविलेला साप 'फॉर्स्टन मांजऱ्या सर्प' आहे.

**३. उडता सोन सर्प** : चित्रामध्ये दाखविलेला साप हा 'उडता सोन सर्प' आहे. चित्रात दाखविल्याप्रमाणे यांची रंगसंगती अतिशय सुंदर असते. त्यांच्या फिक्कट पिवळया/हिरव्या शरीरावर काळे पट्टे व तांबडे ठिपके असतात. या सापाचे डोके चपटे व काळे असून त्यावर पिवळे पट्टे असतात. या सापाची लांबी ३ ते ६ फूट असते. हे साप घनदाट जंगलांतील उंच झाडांवर वास्तव्य करतात. शत्रूपासून बचाव करण्यासाठी अथवा भक्ष्याचा पाठलाग करण्यासाठी, ते झाडाच्या फांद्यांवरून उडया घेतात. त्यावेळी ते आपले अंग ताणतात, पोट आत ओढून घेतात व कागदी विमानाप्रमाणे संथ गतीने खाली उडत येतात. हे साप अंडज व दिनचर आहेत. त्यांच्या पुढील दातांतील विषयुक्त लाळेमुळे त्यांचे भक्ष्य मलूल पडते. या सापाच्या उडतानाची चित्रफीत पाहण्यासाठी पुढील संकेत स्थळाला जरूर भेट द्या. http://www.youtube.com/watch?v=3vhgC_g1cmU&NR=1&feature=endscreen





**गैरसमज** : साप जेवढा रंगीबेरंगी तेवढा तो विषारी असतो, या गैरसमजूतीमुळे या सापांची विषारी समजून विनाकारण हत्या केली जाते. हे साप निमविषारी असून यांचा दंश मनुष्यप्राण्यासाठी प्राणघातक नसतो.

**४. झिलन** : चित्रामध्ये दाखविलेला साप 'झिलन' आहे. तो निमविषारी साप आहे. किनारपट्टीत, दलदलीच्या ठिकाणी, तिवरांमध्ये तो आढळतो. मासे, छोटे खेकडे, शिंपले खाऊन तो गुजराण करतो. हा साप १ ते २ फूट लांबीचा असतो. शरीराचा वरील भाग काळसर राखाडी रंगाचा असून, खालची कडा पांढुरक्या रंगाची असते. याची शेपटी आखूड असते. हा साप पिल्लांना जन्म देतो. हा साप निशाचर असून, कधी-कधी दिवसा दृष्टीस पडतो.



**५. रेती सर्प** : निमविषारी गटात मोडणाऱ्या या सापाचे तीन प्रकार महाराष्ट्र, गुजरात व भारताच्या उत्तर-पश्चिम प्रांतात सापडतात. हे साप अंडज असून बेडूक, सरडे, पाली खाऊन आपली गुजराण करतात.

१. **पट्टेरी रेती सर्प** : या सापाचे शरीर लांब, सडपातळ असून फिक्कट तपकिरी अथवा हिरवट रंगाच्या शरीरावर तपकिरी रंगाच्या लांब पाच उभ्या रेषा असतात. डोळे मोठे असून डोळयांची बाहुली गोल असते.

२. **जाड रेती सर्प** : जाडजूड शरीराच्या या सापाची मान फिक्कट रंगाची असून, शरीर मात्र चमकदार तपकिरी खवलांचे असते. वरच्या भागातील खवलांना काळी किनार असते. हे साप शक्यतो दंश करत नाहीत परंतु दंश झाल्यास थोडी फार सूज येते. या सापाचे विष सौम्य असल्याकारणाने मानवी जीवितास अपायकारक नसते. हा साप खालील चित्रात दाखविला आहे.



